**संगणक चाचणी परीक्षा (Confirmatory Test)**
**उत्तीर्ण करुन प्रमाणपत्र सादर करण्यासाठी मुदतवाढ.**

**महाराष्ट्र शासन**
शासन निर्णय क्रमांक मातंस/प्रक्र ०३/६५/३९,
**सामान्य प्रशासन विभाग,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १७ मे, २००३

संदर्भ:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण १०००/प्रक्र १४३/३९, दि. १०.७.२०००
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. प्रशिक्षण २०००/प्रक्र ५/२००१/३९, दि. २०.७.२०००

## प्रस्तावना:-

शासकीय कामकाजाचे संगणकीकरण करण्याबाबतच्या धोरणात्मक निर्णयास अनुसरुन शासकीय कामकाजात संगणकाचा परिणामकारकरित्या वापर होण्यासाठी प्रशिक्षित अधिकारी/कर्मचारी उपलब्ध होण्यासाठी संगणक प्रशिक्षण खर्च व प्रोत्साहनात्मक रक्कम देण्याचाही निर्णय घेतला होता. परंतु ज्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांनी प्रोत्साहनात्मक रक्कम व संगणक प्रशिक्षण खर्च घेतलेला आहे अथवा अशा रक्कमेची मागणी केलेली आहे त्यांनी महाराष्ट्र राज्य तंत्र शिक्षण मंडळामार्फत घेतली जाणारी चाचणी परीक्षा उत्तीर्ण होणे आवश्यक करण्यात आले आहे.

२. दि. २०.७.२००२ च्या शासन निर्णयान्वये शासकीय सेवेतील गट अ, गट ब व गट क मधील अधिकारी/कर्मचाऱ्यांनी संगणक चाचणी परीक्षेचे प्रमाणपत्र सादर करण्यासाठी दि. २०.७.२००३ पर्यंत मुदत देण्यात आलेली आहे. परंतु शासनाकडे उपलब्ध असलेली संगणक संख्या व शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांची संख्या विचारात घेता राज्यातील सर्व अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक चाचणी परीक्षेस पुरेसा अवधी देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती. संगणक चाचणी परीक्षा (Confirmatory Test) उत्तीर्ण करुन प्रमाणपत्र सादर करण्यासाठी मुदतवाढ देण्याबाबत शासन खालील प्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय:-

प्रस्तावनेत नमुद केल्याप्रमाणे सध्या शासकीय सेवेत असलेल्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक चाचणी परीक्षेचे (Confirmatory Test) विहित प्रमाणपत्र प्राप्त करुन शासनास प्रमाणपत्र सादर करावयाचा दिनांक शासन निर्णय क्रमांक प्रशिक्षण-२०००/प्रक्र५/२००१/३९, दि.२० जुलै २००२ अन्वये २०.७.२००२ असा पूर्वी निश्चित करण्यात आला होता. तथापी या शासन निर्णयाद्वारे शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांना संगणक चाचणी परीक्षेचे (Confirmatory Test) विहित प्रमाणपत्र सादर करण्यास मुदत वाढ देण्यात आली असून संगणक चाचणीचे विहित प्रमाणपत्र शासनास सादर करण्याचा अंतिम दिनांक २०.१.२००४ असा निश्चित करण्यात आला आहे.

शासन निर्णय, दि. २०.७.२००२ मधील इतर बाबी कायम रहातील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**(नितीन गद्रे)**
**उप सचिव तथा संचलक (मातं)**

**प्रति,**
राज्यपाल यांचे सचिव,
मुख्यमंत्री यांचे सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे सचिव,

सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्यसचिव यांचे खाजगी सचिव,
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा) मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपिल शाखा) मुंबई,
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,(विधान परिषद /विधान सभा),मुंबई,
महालेखापाल -१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र , नागपूर,
महालेखापाल -१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई,
महालेखापाल -२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र , नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / लेखा कोष भवन वांद्रे (पू.) मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषद/महानगरपालिकांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व नगरपरिषदांचे मुख्याधिकारी,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ, मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती (२ प्रती).

—x—

मत्र- 299 (4000 - 5 - 03) 13r